महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांच्या आस्थापनेवर बाहयस्त्रोताद्वारे सेवा उपलब्ध करून घेण्यासाठी येणाऱ्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण ८२२३/प्र.क्र.२५/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २५ जुलै, २०२३

**वाचा:-** १) शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक विभाग क्र.संकीर्ण ८२२०/प्र.क्र.२६/सां.का.४, दिनांक ७ एप्रिल, २०२२
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि २०१३/प्र.क्र.११२/१३/वित्तीय सुधारणा-१
३) सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांचे पत्र क्र. मराहिंसिंगुसाअ/आस्था/१७०८-१७०९/२०२३, दिनांक १४ जुलै, २०२३

**प्रस्तावना:-**

उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांच्या आस्थापनेवरील ८ पदांच्या बाह्यस्त्रोतामार्फत दिनांक १ मार्च २०२२ ते ३१ जानेवारी २०२३ या ११ महिन्याच्या कालावधीकरीता उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्यात आली होती. उपर्निर्दिष्ट क्र. २ येथील शासन परिपत्रकास अधिन राहून उपर्निर्दिष्ट क्र. ३ येथील पत्रान्वये सदर बाह्यस्त्रोत पुरवठादार संस्थेस तीन महिन्यांची मुदतवाढ देण्याचे प्रस्तावित करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई मधील बाह्यस्त्रोत कर्मचाऱ्यांच्या सेवा उपलब्ध करुन घेण्यास मुदतवाढ देण्याची व त्यावरील होणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांच्या आस्थापनेवरील खालील तपशीलात नमूद केल्यानुसार एकूण ०७ पदांच्या सेवा दिनांक ०१ ऑगस्ट, २०२३ ते ३१ ऑक्टोबर, २०२३ या ०३ महिन्याच्या कालावधीकरिता पात्र निविदा धारक मे. नित्यर्थ फॅसिलीटी मॅनेजमेंट ॲन्ड सर्व्हिसेस, जि. नाशिक या संस्थेकडून बाह्यस्त्रोत पध्दतीने उपलब्ध करुन घेण्यास व त्यावरील होणारा रुपये ६,११,००४/- (रुपये सहा लाख अकरा हजार चार फक्त) इतक्या खर्चाच्या रकमेस या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

सदर पदांच्या सेवा बाह्यस्त्रोताद्वारे उपलब्ध करून घेण्यासाठी येणाऱ्या खर्चाचा तपशिल खालीलप्रमाणे :-

| अ. क्र | पद | मासिक वेतन | पदांची संख्या | एकूण वेतन (१ महिने) | एकूण वेतन (३ महिने) | GST १८% | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | टिपणी सहायक | ३०,०००/- | ३ | ९०,०००/- | २,७०,०००/- | ४८,६००/- | ३,१८,६००/- |
| २ | लिपिक-टंकलेखक | २३,५००/- | २ | ४७,०००/- | १,४१,०००/- | २५,३८०/- | १,६६,३८०/- |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | शिपाई | १७,८००/- | २ | ३५,६००/- | १,०६,८००/- | १९,२२४/- | १,२६,०२४/- |
| | | **७१,३००/-** | **७** | **१,७२,६००/-** | **५,१७,८००/-** | **९३,२०४/-** | **६,११,००४/-** |

२. सदरील खर्च संबंधित मुख्य लेखाशीर्ष क्र. २२०५, कला व संस्कृती (००) १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०८) (०१) हिंदी अकादमीची आस्थापना - (२२०५ १६८८), (०९) (०१) सिंधी अकादमीची आस्थापना - (२२०५ १६९७), (१२) (०१) गुजराती अकादमीची आस्थापना (२२०५ १७२१) “१० कंत्राटी सेवा” या लेखा उद्दिष्टाखाली संबंधित साहित्य अकादमीकरीता सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. याकरीता सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर पात्र निविदा धारकाने उपरोक्त नमूद तपशिलाप्रमाणे रक्कमांचे प्रदान संबंधितांना केली आहे तसेच त्यातून सर्व वैधानिक कपाती (उदा. कर्मचारी भविष्य निर्वाह निधी, कर्मचारी राज्य विमा, व्यवसाय कर, आयकर, महाराष्ट्र कामगार कल्याण निधी इ.) केल्या आहेत हे तपासण्याची तसेच यासबंधी वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या निधी वितरणाबाबतच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांची राहील. तसेच बाह्यस्रोत कर्मचाऱ्यांना पुरवठादारामार्फत प्राप्त होणारे यथायोग्य वेतन दरमहा मिळत असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांची राहील.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३ विनियम भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ चे परिशिष्ट, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग ४, अ.क्र.११ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२६११४७०७७०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2023.07.26 11:48:40 +05'30'

**(अनिरुध्द सु.देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

२. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. सहसंचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी मुंबई,
५. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) -१ महाराष्ट्र, मुंबई
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
९. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१ महाराष्ट्र, मुंबई
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -२ महाराष्ट्र, नागपूर
११. कार्यासन अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
१२. निवड नस्ती, सां.का.४